मुख्य कार्यकारी अधिकारी, आरे यांचे आस्थापनेवरील आरे रुग्णालयातील स्त्री-वैद्यकिय अधिकारी या पदनामामध्ये स्त्री/पुरुष वैद्यकिय अधिकारी असा बदल करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. दुवियो २०१२/प्र.क्र.१०२/पदुम- ९**
**मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई- ४०००३२**
**दिनांक : १५ सप्टेंबर, २०१४**

**वाचा:**

१. शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्रमांक- दुवियो-२०१२/प्र.क्र.१०२/पदुम-९, दि.३०/०८/२०१४.
२. शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्रमांक- पसप्र-२०११/प्र.क्र.४३३/पदुम-१, दि.१७/१२/२०११.

**प्रस्तावना:**

दुग्धव्यवसाय विकास विभागातील ४०९७ पदांच्या सुधारित आकृतीबंधास उपरोक्त शासन निर्णय क्र. दुवियो-२०१२/प्र.क्र.१०२/पदुम-९, दि.३०/०८/२०१४ अन्वये शासनाची मंजूरी देण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयासोबत जोडलेल्या प्रपत्र-अ-३ मध्ये मुख्य कार्यकारी अधिकारी, आरे यांच्या आस्थापनेवरील पदांचा तपशील दर्शविण्यात आलेला आहे. सदर तपशिलामध्ये अनुक्रमांक ११ मध्ये स्त्री वैद्यकिय अधिकारी असे पदनाम असलेले रु.९३००-३४८००(ग्रेड पे-४३००) या पे-बँड मधील गट क मधील एक पद मंजूर ठरविण्यात आलेले आहे. आरे दुग्ध वसाहतीमधील रुग्णालयातील वैद्यकिय अधिकाऱ्यांची पदे दि.२६/०४/१९७६ च्या शासन निर्णयानुसार निर्माण करण्यात आलेली असून, त्यामध्ये महिला वैद्यकिय अधिकारी हे वर्ग-३ संवर्गातील पद त्यावेळी निर्माण करण्यात आलेले आहे.

आदिवासी पाडयातील महिला स्त्री रोग, प्रसुती याबाबत पुरुष वैद्यकिय अधिकाऱ्याकडून वैद्यकिय तपासणी करुन घेण्याची मानसिकता नसल्यामुळे महिला वैद्यकिय अधिकाऱ्याचे पदे तत्कालीन परिस्थिती विचारात घेऊन निर्माण करण्यात आलेले हाते. सद्यस्थितीत या परिस्थितीमध्ये बदल झालेला असून त्या भागातील आदिवासींची मानसिकता बदललेली आहे व ते पुरुष वैद्यकिय अधिकाऱ्याकडून देखील उपचार करुन घेतात. सदर बदललेली मानसिकता विचारात घेऊन तसेच वैद्यकिय अधिकाऱ्यांची पदे भरण्यास व त्यांची वेतन देयके अधिदान व लेखा अधिकाऱ्यांकडून मंजूरी मिळण्यासाठी अडचणी निर्माण होऊ नये याकरिता हे पद स्त्री/पुरुष वैद्यकिय अधिकारी यांचे नियुक्तीने भरण्यास संदर्भाधीन दि.१७/१२/२०११ च्या शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात आली होती.

**शासन निर्णय :**

उपरोक्त नमूद दि.३०/०८/२०१४ च्या शासन निर्णयातील प्रपत्र-अ-३ मधील मुख्य कार्यकारी अधिकारी, आरे यांच्या आस्थापनेवरील अनुक्रमांक ११ मधील स्त्री वैद्यकिय अधिकारी या पदनामाऐवजी स्त्री/पुरुष वैद्यकिय अधिकारी असा बदल करण्यात येत आहे.

२. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०१४०९१५१७४००९०५०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sathe Shashank M

Digitally signed by Sathe Shashank M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sathe Shashank M
Date: 2014.09.15 17:37:11 +05'30'

**(श.मा.साठे)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति:**

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) मुंबई/नागपूर
२. आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास विभाग, वरळी, मुंबई १८
३. उप आयुक्त (प्रशासन) दुग्धव्यवसाय विकास विभाग, वरळी, मुंबई १८
४. प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, कोकण विभाग, नवी मुंबई
५. महाव्यवस्थापक, बृहन्मुंबई दूध योजना, वरळी, मुंबई -१८
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, आरे, आरे दुग्धवसाहत, गोरेगाव (पूर्व), मुंबई -६५
७. संचालक, आरोग्य, जी.टी. हॉस्पीटल, मुंबई
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१०. निवड नस्ती